S-20040719135026001-2500

एकात्मिक बाल [illegible] योजनेअंतर्गत कार्यरत अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना प्रसुती तसेच गर्भपात / गर्भस्त्राव रजा मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन परिपत्रक क्रमांक - एबावि २००२ / प्र.क्र. ३९२ / का - ६

नविन प्रशासन भवन , मंत्रालय ,

मुंबई - ४०० ०३२.

दिनांक २५ ऑक्टोबर , २००२ .

वाचा - केंद्र शासनाचे पत्र क्र. २६-२ / ९८ / २००१ / सीडी - २ / सीडी - १, दि. २८ /२ / २००१ .

**शासन परिपत्रक :** एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केली जाते . सदर योजनेअंतर्गत कार्यरत असलेल्या अंगणवाडी सेविका (कार्यकर्ती) व मदतनीस या मानधनी कर्मचा-यांना केंद्र शासनाच्या निर्देशानुसार रजा मंजूर करण्यात येतात . केंद्र शासनाने त्यांच्या उपरोक्त दि. २८/२/२००१ च्या पत्राद्वारे अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना मंजूर केली जाणारी बाळंतपणाची रजा ९० दिवसांवरुन १३५ दिवस व गर्भपात / गर्भस्त्राव यासाठी दिली जाणारी रजा ४२ दिवसावरुन ४५ दिवस इतकी वाढविलेली आहे . तसेच सदर रजा मंजूर करण्याच्या संदर्भात काही अटी विहीत केल्या आहेत . तरी त्यानुसार अंगणवाडी सेविका व मदतनीस या मानधनी कर्मचा-यांना बाळंतपणाची तसेच गर्भपात / गर्भस्त्राव याबाबतची रजा मंजूर करण्यात यावी . आयुक्त , एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी सदर आदेश सर्व बाल विकास प्रकल्प अधिका-यांच्या निदर्शनास आणावेत व त्यांना आवश्यक कार्यवाहीच्या योग्य त्या सूचना द्याव्यात .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने ,

( ग.गो.पंचभाई )
शासनाचे सह सचिव.

प्रति,

मा.मंत्री (महिला व बाल विकास ) , महाराष्ट्र राज्य , मंत्रालय , मुंबई.
मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास) , महाराष्ट्र राज्य , मंत्रालय , मुंबई .
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
प्रकल्प समन्वयक, जागतिक बँक सहाय्यित ए.बा.वि.से.योजना प्रकल्प - ३, रायगड भवन, नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक आरोग्य विभाग , मंत्रालय , मुंबई .
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
महालेखापाल, महाराष्ट्र , १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
निवड नस्ती (का-६)